/

201104062218590001

**वितरण आदेश क्रमांक-२९.**

**सन २०१० - ११ या आर्थिक वर्षासाठी मा. लोक प्रतिनिधींनी सुचविलेल्या ग्रामीण भागातील गावांतर्गत रस्ते, गटारे व अन्य मुलभूत सुविधांच्या कामांसाठी विशेष अनुदान देण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग ,
शासन निर्णय क्र.विकास २०१०/प्र.क्र.१०१/पं.रा.८
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- **३१ मार्च,**२०११.

**संदर्भ** :-१) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
क्र. विकास-२००९/प्र.क्र.८/पंरा-८, दि.२४.२.२००९.
२) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
क्र. झेडपीए-२००८/प्र.क्र.४४४/वित्त-९, दिनांक १५.७.२००८.
३) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
क्र.विकास २०१०/ प्र.क्र. १०१ (भाग -१) / पंरा ८,दिनांक ३१ मार्च,२०११

## शासन निर्णय :-

राज्यातील गावांतर्गत मुलभूत सुविधांच्या कामांसाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत अनेक लोकप्रतिनिधींकडून प्रस्ताव शासनाकडे प्राप्त होत असतात.त्यानुषंगाने मा.लोकप्रतिनिधींनी सुचविलेल्या ग्रामीण भागातील गावांतर्गत रस्ते,गटारे व अन्य मुलभूत सुविधांच्या कामांसाठी, दि.२४.२.२००९ अन्वये शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे.

२. सन २०१०-११ या वित्तीय वर्षासाठी लोकप्रतिनिधींनी सुचविलेल्या ग्रामीण भागातील अंतर्गत रस्ते, गटारे व इतर मुलभूत सोयी पुरविण्यासाठी रु.७५,००,००,०००/- (रुपये पंच्याहत्तर कोटी फक्त) इतकी तरतूद डिसेंबर, २०१० च्या हिवाळी अधिवेशनामध्ये अर्थसंकल्पित करण्यात आलेली आहे. यासंदर्भात पुरवणी विनियोजन विधेयकास मा.राज्यपालांनी संमती दिलेली आहे. आणि ते, महाराष्ट्र ( तृतीय पुरवणी ) विनियोजन अधिनियम,२०१० (सन २०१० चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक २५) म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-४ दिनांक १० डिसेंबर, २०१० यामध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे.

३. सन २०१०-११ या वित्तीय वर्षासाठी वरील प्रमाणे उपलब्ध झालेला रु.७५,००,००,०००/- (रुपये पंच्याहत्तर कोटी फक्त) इतका निधी संदर्भिय क्रमांक ३ च्या शासन निर्णयान्वये मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद, ठाणे यांचे अधिनस्त ठेवण्यात आलेला आहे. सदर रु.७५,००,००,०००/- (रुपये पंच्याहत्तर कोटी फक्त )

इतक्या तरतूदीपैकी रु.६०,००,०००/- **(रुपये साठ लक्ष )** इतकी रक्कम सोबतच्या अनुसूची-१ मध्ये दर्शविलेल्या कामांसाठी व रु.५०,००,०००/- **(रुपये पंन्रास लक्ष)** इतकी रक्कम सोबतच्या अनुसूची-२ मध्ये दर्शविलेल्या कामांसाठी मुख्य कार्यकारी अधिकारी, **जिल्हा परिषद, नागपूर** यांना वितरित करण्यास शासन मंजूरी देत आहे. मुख्य कार्यकारी अधिकारी, **जिल्हा परिषद, ठाणे** यांनी सदर रक्कम मुख्य कार्यकारी अधिकारी **जिल्हा परिषद, नागपूर** यांचेकडे वर्ग करण्याची कार्यवाही त्वरीत करावी. मुख्य कार्यकारी अधिकारी, **जिल्हा परिषद, नागपूर** यांनी सदर रक्कम सोबतच्या अनुसूचीमध्ये दर्शविलेल्या कामाकरिता खर्च करण्यासाठी संबंधित ग्रामपंचायतींच्या गट विकास अधिका-यांकडे सुपूर्द करावी.तसेच पुढील कार्यवाही संदर्भाधीन शासन निर्णयातील सूचनेनुसार करण्यात यावी.

४. सर्व कामांचे अंदाजपत्रके प्राप्त करुन प्रचलित नियमानुसार प्रशासकीय मंजुरी व तांत्रिक मंजुरी देण्याबाबत कार्यवाही करण्यात यावी. सोबतच्या अनुसूचीतील कामे मंजूर अनुदानाच्या मर्यादेत पूर्ण होतील याची दक्षता घेण्यात यावी. मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्चाच्या कामांना प्रशासकीय मान्यता दिल्यास त्यासाठी कुठल्याही स्वरुपात अतिरिक्त अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही. तसेच संबंधित क्षेत्रात जिल्हा परिषद, पंचायत समिती व ग्रामपंचायतीच्या सार्वत्रिक निवडणूका /पोट निवडणूकांसाठी आचारसंहिता अंमलात नाही याबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी, **जिल्हा परिषद, नागपूर** यांनी खात्री करावी.

५. सर्व कामांचे पूर्णत्वाचे दाखले व उपयोगिता प्रमाणपत्र संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी महालेखापाल, संबंधित विभागीय आयुक्त व शासनास पाठवावेत.

६. वरील बाबीवर होणारा खर्च "मागणी क्र. एल-३ मुख्य लेखाशिर्ष-२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम-००-८००-इतर खर्च (०१) (०८) ग्रामीण भागातील विकास कामासाठी जिल्हा परिषदांना अनुदाने (२५१५-१२३-८), ३१-सहायक अनुदाने या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१०-११ या चालू वित्तीय वर्षातील तरतूदीतून भागविण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १८५ / ११/ अर्थ -१७, दिनांक १.३.२०११ व अनौपचारीक संदर्भ क्रमांक ३४३/११/ अर्थ -१७, दिनांक ३१.३.२०११ अन्वये त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( दि.ग.मोरे )
उप सचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,

१ मा.मंत्री (ग्रा.वि.)यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई-३२.
२ मा.राज्यमंत्री (ग्रा.वि.).)यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई-३२
३ महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) -१/२,महाराष्ट्र ,मुंबई/नागपूर
४ महालेखापाल (लेखा परिक्षा)-१/२ ,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर
५ विभागीय आयुक्त, कोकण विभाग /नागपूर
६ जिल्हाधिकारी,ठाणे / **नागपूर**
७ मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे / **नागपूर**
८ मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे / **नागपूर**

**शासन निर्णय क्र.विकास-२०१०/प्र.क्र.१०१/पंरा-८, दि.३१ मार्च, २०११**

**वितरण आदेश क्र. २९ सोबतची अनुसूची क्र. १**

**२५१५ अंतर्गत नागपूर जिल्हयातील कामांची यादी**

| अ.क्र. | कामाचे नाव | रक्कम (रु.लाखात) |
| --- | --- | --- |
| १ | पाटण सावंगी ता.सावनेर ग्रामपंचायत अंतर्गत विविध कामे | ४०.०० |
| २ | पारशिवणी, ता.पारशिवणी येथे सिमेंट क्रॉंक्रीट रस्ता तयार करणे | १०.०० |
| ३ | तारसा, ता.मौदा येथे सिमेंट क्रॉंक्रीट रस्ता तयार करणे | १०.०० |
| | **एकूण** | ६०.०० |

( दि.ग.मोरे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**शासन निर्णय क्र.विकास २०१०/प्र.क्र.१०१ /पं.रा.८, दिनांक ३१ मार्च,२०११**
**वितरण आदेश क्र. २९ सोबतची अनुसूचीक्र. २**
**२५१५-अंतर्गत .नागपूर जिल्हयातील कामांची यादी.**

| अ.क्र. | कामाचे नांव | अंदाजित किंमत (रु.लाखात) |
|---|---|---|
| १ | कोंढाळी वार्ड क्र.१ मध्ये सिमेंट रस्त्याचे बांधकाम करणे | ४.०० |
| २ | कोंढाळी वार्ड क्र.६ मध्ये सिमेंट रस्त्याचे बांधकाम करणे | ४.०० |
| ३ | दुधाळा येथे सिमेंट रस्ता बांधकामे करणे | २.०० |
| ४ | धोटीवाडा येथे सिमेंट रस्त्याचे बांधकाम करणे | ३.०० |
| ५ | जुनापाणी येथें सिमेंट रस्त्याचे बाधकाम करणे | ३.०० |
| ६ | खैरी (चिखली) येथे सिमेंट रस्त्याचे बांधकाम करणे | २.०० |
| ७ | चिखली (खैरी) येथे बस स्टॉप वर प्रवासी निवारा करणे | २.०० |
| ८ | शिरपुर (भूयारी) येथे सिमेंट रस्त्याचे बांधकाम करणे | २.०० |
| ९ | बाजारगावअंतर्गत रस्त्याचे बांधकाम करणे | ४.०० |
| १० | सावंगा (शिवा) येथे सिमेंट रस्त्याचे बांधकाम करणे | २.०० |
| ११ | पेठ येथे सिमेंट रस्त्याचे बांधकाम करणे | २.०० |
| १२ | मेटपांजरा येथे सिमेंट रस्त्याचे बांधकाम करणे | ४.०० |
| १३ | गरमसूर येथे सिमेंट रस्त्याचे बांधकाम करणे | २.०० |
| १४ | धनकुंड येथे सिमेंट रस्त्याचे बांधकाम करणे | २.०० |
| १५ | चारगांव येथे सिमेंट रस्त्याचे बांधकाम करणे | २.०० |
| १६ | कचारीसावंगा येथे समाजमंदिर बाधणे ( नवीन वस्ती ) | ५.०० |
| १७ | मिनीवाडा येथे सिमेंट रस्त्याचे बांधकाम करणे. | ३.०० |
| १८ | पांजराकाटे येथे सिमेंट रस्त्याचे बांधकाम करणे. | २.०० |
| | **एकूण :** | **५०.००** |

( दि. ग. मोरे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन